सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी निधी वितरीत करण्यास मंजूरी....
वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित)

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : वनामं-२०१९/प्र.क्र.६५/महामंडळे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १७ मार्च, २०२०.**

वाचा :- १) शासन निर्णय, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.वनामं-२०१९/प्र.क्र.६५/महामंडळे, दि.३१ मे, २०१९.
२) शासन निर्णय, इमाव, सावशैमाप्र, विजाभज आणि विमाप्र कल्याण विभाग क्र.वनामं-२०१९/ प्र.क्र.६५/महामंडळे, दि.१९ ऑक्टोबर, २०१९.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२ जानेवारी, २०२०.

## शासन निर्णय

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळास ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी रु.१०,०७,७२,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून संदर्भ क्र.१ येथे नमूद दि.३१ मे, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.३,३५,९१,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच, संदर्भ क्र.२ येथे नमूद दि.१९ ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.२,६८,७२,२००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

२. वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या सुधारित अंदाजामध्ये ३६, सहायक अनुदाने (वेतन) करिता रु.७,०४,६३,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळास मूळ अर्थसंकल्पीय तरतुदीच्या ८०% च्या मर्यादेत उर्वरित रु.९९,९९,८००/- (रु.नव्व्याणव लक्ष नव्व्याणव हजार आठशे फक्त) इतके सहायक अनुदान (वेतन) खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत. तसेच, ज्या योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच योजनेसाठी निधी खर्च करण्यात यावा.
२. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
३. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.
४. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.

५. महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.
६. सदर योजनेचा निधी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.
७. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.
८. संदर्भ क्र.२ येथे नमूद दि.०८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकातील प्रत्येक अटींची पूर्तता महामंडळाकडून करण्यात यावी.
९. शासनाव्दारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS व्दारे प्रदान करणे बंधनकारक राहील, कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व offline पध्दतीने वितरीत करण्यात येऊ नये.

**३.** वरील अनुदानाबाबत सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळास संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

**४.** या बाबीवरील खर्च मागणी क्र. झेडजी-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास (०२) विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळाला अनुदान (०२)(०१) वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ (अनिवार्य) (२२२५ई८४८), ३६, सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाखली खर्ची टाकून सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**५.** हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२ जानेवारी, २०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१७१४५७०३६७२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

RAVINDRA
VASANTRAO GURAV

Digitally signed by RAVINDRA VASANTRAO GURAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=9dfb7aefbd9e82b129c324d567b46e1d853d93c38d6e222c868eac72ecd12784, ou=VJNT OBC AND SBC DEPT, o=GOVERNEMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA VASANTRAO GURAV
Date: 2020.03.17 15:27:59 +05'30'

**(रविन्द्र गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. सह सचिव /उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई.

३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.

५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४/अर्थसंकल्प-३) मंत्रालय, मुंबई.

७. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई.

८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. निवडनस्ती (महामंडळे).

*****